सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) लेखाशीर्षांतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सावचि-२०२१/प्र.क्र.१४/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : ९.०२.२०२२**

**वाचा:-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.६.०४.२०२१
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं -२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
३) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र. ५७/(१९-२०)/१६३/२०-२१, दि. २.०८.२०२१.
४) प्रधान मुख्य वन संरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्रमांक कक्ष-१/ पी/यो/अ.स./ प्र.क्र. ०९/२०२१-२२, दि. ६.०८.२०२१.
५) शासन निर्णय क्रमांक सावचि-२०२१/प्र.क्र.१४/फ-११, दि. ९.०८.२०२१.
६) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१.
७) शासन निर्णय क्रमांक सावचि-२०२१/प्र.क्र.१४/फ-११, दि. १५.१२.२०२१.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि. २८.०१.२०२२.

**प्रस्तावना:-**

सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात शासनाच्या महत्वाकांक्षी वृक्ष लागवडीच्या प्रकल्पासाठी इको बटालियनच्या माध्यमातून ४५ हेक्टर क्षेत्रावर लागवडपूर्व कामे करणे, ४५ हेक्टर क्षेत्रावर प्रथम वर्षीय कामे, १२७ हेक्टर क्षेत्रावर द्वितीय वर्षीय कामे, १६५ हेक्टर क्षेत्रावर तृतीय वर्षीय रोपवन कामे, १२५ हेक्टर क्षेत्रावर चतुर्थ वर्षीय कामे व ६५ हेक्टर क्षेत्रावर पंचम वर्षीय रोपवन कामे तसेच इको बटालियनच्या सदस्यांकीरता सोई सुविधा, त्यांचे वेतन व भत्ते यासाठी सन २०२१-२२ करिता रु.१५००.०० लक्षचा चालू बाब प्रस्ताव संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सादर केला आहे.

२. कोविड-१९ च्या महामारीमुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात होणाऱ्या अर्थव्यवस्थेवरील परिणामाबाबत वित्तीय उपाययोजना, शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २४.६.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयानुसार सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय निधीच्या ६० टक्के निधी उपलब्ध होईल या सूत्राच्या अधिन राहून विभागाने नियोजन करावयाचे आहे. त्यानुसार प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये

विभागातील योजनांकरिताचा नियतव्यय ६० टक्केच्या मर्यादेत निश्चित करून, त्याबाबतचा तपशील सादर केलेला आहे. त्यानुसार सन २०२१-२२ करिता इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११) या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रू.१५००.०० लक्ष या नियतव्ययापैकी रू. ९००.०० लक्ष नियतव्यय निश्चित केलेला आहे.

३. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १, २, ६ व ८ चे परिपत्रक व शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ९ महिन्यांच्या कालावधीसाठी (डिसेंबर, २०२१ पर्यंत) अनिवार्य खर्चाच्या निधी वितरण/खर्चाची मर्यादा ७५ % इतकी विहीत करण्यात आली आहे. मात्र २१-पुरवठा व सामूग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी, ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर), ३२-अंशदाने व ३३-अर्थसहाय या बाबींसाठी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील. तसेच कार्यक्रम खर्चासाठी ५०% इतक्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. मात्र कार्यक्रम खर्चाची वर्ष अखेरची मर्यादा ६०% इतकीच राहील, असे नमूद केले आहे.

४. शासन निर्णय संदर्भ क्र. ५ व ७ अन्वये सदर योजनेंतर्गत ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत अनुक्रमे रु.१५०.०० लक्ष व रु. ६००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सबब, ६० % च्या मर्यादेत उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात वन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या **"इको टास्क फोर्स बटालियन (२४०६ A२११)"** योजनेकरिता रु.१५००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. त्यापैकी ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत रु. १५०.०० लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी. सदर योजनेतंर्गत प्रस्तावित कामांना तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देण्यात आली असल्याची खात्री करूनच निधी वितरित करण्यात यावा.

३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), हे वर्ष २०२१-२२ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील.

४. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

५.  सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६.  जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७.  सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र. सी-०७**
**२४०६, वनीकरण व वन्यजीवन (राज्य) योजनांतर्गत योजना**
**११० वन्य जीव संरक्षण**
**इको टास्क फोर्स बटालियन (००)(२६) (२४०६ A२११)**
**५०- इतर खर्च**

८.  सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १, २, ६ व ८ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक/शासन निर्णयानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ./२७/व्यय-१० दि. २८.०१.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

९.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०९१२५१२१७६१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2022.02.09 12:58:16 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव, महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य ,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. मुख्य वनसरंक्षक ( प्रादेशिक ), औरंगाबाद.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई४०० ०३२.
७. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई.
८. वित्त विभाग, व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ- १, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवडनस्ती फ-११.